अनुकंपा नियुक्ती धोरणातील
तरतुदींमध्ये सुधारणा.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अकंपा-१०१४/प्र.क्र.१५५/आठ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीख: १७ नोव्हेंबर, २०१६

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. अकंपा-१०९३/२३३५/प्र.क्र.९०/९३/आठ, दि. २६.१०.१९९४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. अकंपा-१०९५/प्र.क्र.३४अ/आठ, दि. २३.०८.१९९६
३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र. अकंपा-१००६/प्र.क्र.१७४/०६/आठ, दि. १७.०७.२००७
४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र. अकंपा-१०१३/प्र.क्र.८/आठ, दि. २६.०२.२०१३

**प्रस्तावना :-**

राज्य शासकीय कर्मचारी सेवेत असतांना दिवंगत झाल्यास त्याच्या कुटुंबावर ओढवणाऱ्या आर्थिक आपत्तीत कुटुंबियांना सहाय्य व्हावे व त्यांना आर्थिक मदत मिळावी यासाठी अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याचे शासनाचे धोरण आहे. न्यायालयीन प्रक्रियांमध्ये मुलगा व मुलगी यांच्या मधील लिंग भेद दूर व्हावा तसेच मुलगा व मुलगी यांना समान गणले जावे याकरीता मुलाप्रमाणेच विवाहीत अथवा अविवाहीत मुलीस अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी पात्र ठरविण्याबाबत शासनाचे धोरण होते. त्यानुसार शासन निर्णय दि. २६.०२.२०१३ अन्वये शासनाने विवाहीत मुलीस देखील अनुकंपा नियुक्तीसाठी पात्र ठरविले. परंतु सदर शासन निर्णयात काही त्रुटी उद्भवल्याने व अस्पष्ट तरतूदी असल्याचे दिसुन आल्या. या संबंधी मा. प्रशासकीय न्यायाधीकरण व मा. उच्च न्यायालय यांचे आदेश तसेच मा. उच्च न्यायालयाची मार्गदर्शक तत्वे विचारात घेवून अनुकंपा नियुक्तीसाठी पात्र नातेवाईकांसंबंधी सुस्पष्ट आदेश काढण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे. संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१, २ व ३ अन्वये अनुकंपा नियुक्तीसाठी पात्र कुटुंबियांमध्ये दिवंगत राज्य शासकीय कर्मचा-याची पती/पत्नी, मुलगा किंवा अविवाहीत मुलगी अथवा मृत्युपूर्वी कायदेशीररीत्या दत्तक घेतला/घेतलेली मुलगा/अविवाहीत मुलगी, दिवंगत शासकीय कर्मचा-याचा मुलगा हयात नसेल व त्याच्या कुटुंबातील पात्र नातेवाईकांव्यतिरिक्त अन्य कोणीही अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी पात्र नसेल तर त्याची सून, केवळ अविवाहीत शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्यावर सर्वस्वी अवलंबून असणारा भाऊ किंवा अविवाहीत बहिण तसेच घटस्फोटित/परित्यक्ता/विधवा मुलगी/बहीण ही नियमानुसार पात्र नातेवाईक मानण्यात आले

आहेत. संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये दिवंगत राज्य शासकीय कर्मचा-यांच्या कुटुंबामध्ये फक्त विवाहीत मुलगी हे एकमेव अपत्य असल्यास किंवा त्यांचे कुटुंब फक्त विवाहीत मुलीवर अवलंबून असेल अशा प्रकरणी दिवंगत शासकीय कर्मचा-याची विवाहीत मुलगी ही अनुकंपा नियुक्तीसाठी पात्र ठरविण्यात आली होती. संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ४ मधील तरतुदींची अंमलबजावणी करताना येणा-या अडचणी तसेच मूळ अर्ज क्र. १५५/२०१२, अर्जदार कु. सुजाता दिनकर नेवसे प्रकरणी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि. २१.०७.२०१४ रोजी दिलेला निर्णयान्वये शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र. अकंपा-१०१३/प्र.क्र.८/आठ, दि. २६.०२.२०१३ हा रद्द झालेला आहे. तसेच या प्रकरणातील रिट याचिका क्र. ११३१/२०१६ , महाराष्ट्र शासन विरुध्द श्रीमती सुजाता दिनकर नेवसे प्रकरणी मा. उच्च न्यायालयात उपस्थित झालेले मुद्दे विचारात घेवून उपरोक्त संदर्भ क्र. १, २ व ३ मध्ये नमूद पात्र नातेवाईकांच्या यादीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय:-**

१. शासन निर्णय क्र. अकंपा-१०१३/प्र.क्र.८/आठ, दि. २६.०२.२०१३ रद्द झाल्याने त्यानुषंगाने तसेच उपरोक्त संदर्भ क्र. १, २ व ३ अन्वये विहीत केलेल्या अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठी दिवंगत शासकीय कर्मचाऱ्यांच्या पात्र नातेवाईकांच्या यादीमध्ये सुधारणा करण्यात येत असून खालील नमूद केलेले नातेवाईक हे अनुकंपा नियुक्तीसाठी पात्र राहतील व त्यापैकी एका पात्र नातेवाईकास नियुक्ती अनुज्ञेय राहील.

१) पती/पत्नी,

२) मुलगा/मुलगी (अविवाहीत/विवाहीत), मृत्युपूर्वी कायदेशीररित्या दत्तक घेतलेला मुलगा/मुलगी (अविवाहीत/विवाहीत)

३) दिवंगत शासकीय कर्मचा-याचा मुलगा हयात नसेल किंवा तो नियुक्तीसाठी पात्र नसेल तर त्याची सून

४) घटस्फोटित मुलगी किंवा बहीण, परित्यक्ता मुलगी किंवा बहीण ,विधवा मुलगी किंवा बहीण,

५) केवळ दिवंगत अविवाहीत शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत त्याच्यावर सर्वस्वी अवलंबून असणारा भाऊ किंवा बहीण .

२. अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्यापूर्वी संबंधितांकडून दिवंगत कर्मचा-यावर अवलंबून असलेल्या कुटुंबातील अन्य व्यक्तींचा सांभाळ करण्याबाबत प्रतिज्ञापत्र घेण्यात यावे. भविष्यामध्ये सदर प्रतिज्ञापत्राचे उल्लंघन झाल्याबाबतची तक्रार संबंधित कुटूंबातील सदस्यांनी केल्यास सदर तक्रारीची चौकशी संबंधित नियुक्ती प्राधिकारी/शिस्तभंग विषयक प्राधिकाऱ्याने करावी. चौकशी अंती अनुकंपा नियुक्तीधारकाने प्रतिज्ञापत्राचे उल्लंघन केल्याचे निष्पन्न झाल्यास त्याला सेवेतून काढून टाकण्याची देखील शिक्षा देता येईल.

३. संदर्भाधीन शासननिर्णय क्र. (१), (२) आणि (३) मधील तरतुदी या आदेशातील उपरोक्त तरतुदींच्या मर्यादेपर्यंत सुधारीत झाल्या आहेत असे समजण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१५१३३५६६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash
Hanmant
Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2016.11.18 15:30:16 +05'30'

**( सु.ह. उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. सर्व सन्माननीय विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य.
५. मा. मुख्य सचिव,
६. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रशान सचिव/सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभाग,
८. प्रबंधक मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
९. प्रबंधक अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
११.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
१२.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१३.सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, (विधान परिषद), मुंबई,
१४.सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,

१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर,

१७.महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,

१८. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपुर,

१९.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

२१.मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,

२२.सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,

२३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२४.निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

२५.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

२६.निवडनस्ती. (कार्यासन-८).